प्रतापनगर, नागपूर पो.स्टे.,गु.नों.क्र.३४८/१३ (एम.पी.आय.डी. प्रकरण) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.बी.एम.करडे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी २०१४/प्र.क्र. २२/पोल-१०**

२ रा मजला, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: ०२ सप्टेंबर, २०१५.

<u>संदर्भ</u> शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र. एसपीपी २६१५/ए.एस.३३/डी-१४, दिनांक २२.०५.२०१५.

**शासन निर्णय:**

प्रतापनगर, नागपूर पो.स्टे.,गु.नों.क्र.३४८/१३ (एम.पी.आय.डी. प्रकरण) मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड.श्री.बी.एम.करडे यांची विधि व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक २२.५.२०१५ च्या अधिसूचनेद्वारे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.बी.एम.करडे यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी-रु . ४,०००/-

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.बी.एम.करडे यांना अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही. तसेच,अंतीम सुनावणीनंतर एकत्रित वकील फी ला वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७७/व्यय-७, दिनांक १७.६.२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०२१६०५५००८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2015.09.02 16:09:51 +05'30'

(अ.वि.जोशी)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त,नागपूर
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड. श्री. बी.एम.करडे, ५६,छत्रपती नगर,वर्धा रोड,नागपूर.
७. विधी व न्याय विभाग (का १४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).